**आरोग्य सेवा आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील आरोग्य संस्थांतील गट-क व ड संवर्गाच्या कर्मचाऱ्यांच्या अध्ययन रजेच्या मंजुरीचे अधिकार आयुक्त, आरोग्य सेवा यांच्याकडे प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः** प्रत्यार्पण-२०२३/प्र.क्र.०१/सेवा-५
गो. ते. रुग्णालय, संकुल इमारत
१० वा मजला, नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
दिनांक : ०७ जून, २०२३

**संदर्भ -**

**१.शासन अधिसूचना क्रमांकः बदली-२०२०/प्र.क्र.३७९/सेवा-५, दि.०३.०२.२०२१.**

**शासन आदेश -**

उपरोक्त संदर्भ क्र. १ मध्ये नमूद अधिसूचनेनुसार आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांना आरोग्य सेवा आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील गट-क व ड संवर्गातील कर्मचाऱ्यांसाठी विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात आलेले आहे .

२. आता, या शासन आदेशानुसार आरोग्य सेवा आयुक्तालयातील गट-क व ड च्या कर्मचाऱ्यांना विहित नियमांनुसार संबंधित कर्मचारी अध्ययन रजेसाठी पात्र असल्यास अध्ययन रजा मंजूरीचे अधिकार विभाग प्रमुख म्हणून आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना प्रदान करण्यात येत आहेत.

३. अध्ययन रजा मंजूर करताना संबंधीत कर्मचाऱ्यांचे यापूर्वी सेवांतर्गत प्रशिक्षण हे प्रतिनियुक्ती संबोधून दिले असले तरी असा प्रतिनियुक्ती दर्शविलेल्या प्रशिक्षण कालावधी हा अध्ययन रजा म्हणून परिगणीत करण्यात यावा व अशा प्रकरणात मर्यादेतच उर्वरीत अध्ययन रजा अनुज्ञेय असल्यास मंजूर करण्यात यावी. तसेच या शासन आदेशाच्या दिनांकानंतर कोणतेही नवीन अध्ययन रजा मंजूरीचे प्रस्ताव उपरोक्तनुसार आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेस्तरावरून निकाली काढण्यात यावे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०५१२०१०८४७१७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2023.06.07 11:28:30 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१.आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२.संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई/पुणे
३.सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) ,मुंबई.
४.महालेखापाल (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
५.महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ , नागपूर.
६.उपसंचालक आरोग्य सेवा, प्रभारी मंडळे, महाराष्ट्र राज्य (सर्व).
७.जिल्हा आरोग्य अधिकारी (सर्व).
८.जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व).
९.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
१०.निवडनस्ती (सेवा-५)